**सन २०१४-१५ करीता राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियानाकरीता आदिवासी उप योजनेंतर्गत (TSP) केंद्र हिश्यापोटी रु. ५४.१४ कोटी मंजूर करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः** सा.आ.वि.-३००११/४४/२०१५-आ-७
जी.टी. रुग्णालय आवार, १० वा मजला,
मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
दिनांक: ७ मार्च, २०१५

वाचा -

१. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७/२६/२०१४-१५, एनएचएम (एफ़)/२, दि. २०/०६/२०१४ चे पत्र.
२. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७/२६/२०१४-१५, एनएचएम (एफ़)/२, दि. २०/०६/२०१४ चे पत्र.
३. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७/२६/२०१४-१५, एनएचएम (एफ़)/२, दि. २०/०६/२०१४ चे पत्र.
४. आरोग्य व कुटुंब कल्याण मंत्रालय, नवी दिल्ली यांचे क्र. जी २७०१७/०५/२०१४-१५, एनआरएचएम (एफ़)/२, दि. ८/१२/२०१४ चे पत्र.

प्रस्तावना -

गरजू ग्रामीण जनतेस सहजसाध्य, परवडण्याजोगी, कार्यक्षम, उत्तरायी आणि विश्वासार्ह अश्या सर्व प्रकारच्या आरोग्य सेवा उपलब्ध करुन देण्याच्या उद्देशाने केंद्र शासनाने संपूर्ण देशात एप्रिल २००५ पासून राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान सुरु केले असून या अभियानामध्ये प्रजनन व बाल आरोग्य, मिशन फ़्लेक्झीपुल, नियमित लसीकरण व अन्य महत्वाचे आरोग्य विषयक कार्यक्रम व घटक अंतर्भूत आहेत. सदर अभियानासाठी केंद्र व राज्य हिश्श्याचे अर्थसहाय्याचे प्रमाण ७५:२५ असे आहे. केंद्र शासनाने ७५ टक्के हिश्यापोटी उपरोक्त पत्रान्वये आदिवासी उपयोजनेंतर्गत मंजूर केलेले सहाय्यक अनुदान वितरीत करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे निर्णय घेण्यात येत आहे.

**शासन निर्णय -**

राज्यामध्ये राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान या केंद्र पुरस्कृत योजनेंतर्गत राबविण्यात येणा-या आरोग्य विषयक कार्यक्रमांसाठी ७५% केंद्र हिश्श्यापोटी आदिवासी उपयोजनेंतर्गत रु. ५४,१४,००,०००/- (रुपये चौपन्न कोटी चौदा लाख फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास पुढीलप्रमाणे मंजूरी देण्यात येत आहे.

| अ. क्र | कार्यक्रम | मंजूर केंद्र हिस्सा |
|---|---|---|
| १ | प्रजनन व बाल आरोग्य (RCH) | २७,९८,००,००० |
| २ | मिशन फ़्लेक्झीपूल (Mission Flexipool) | २६,१६,००,००० |
| | **एकूण** | **५४,१४,००,०००** |

२. उपरोक्त प्रस्तावावरील खर्च, मागणी क्र. आर- १, २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, ०३ - ग्रामीण आरोग्य सेवा - विषमचिकित्सा, ७९६- जनजाती क्षेत्र उप योजना, (०१)- जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना, केंद्र पुरस्कृत योजना - **(केंद्र हिस्सा ७५%),** (०१) (०४) - राष्ट्रीय ग्रामीण आरोग्य अभियान, आदिवासी उप योजना ( २२१० फ़ ७३८), ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) या मुख्य लेखा शिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि सन २०१४-१५ या वित्तीय वर्षासाठी केलेल्या अर्थसंकल्पिय तरतूदीतून भागविण्यात यावा. सदर अनुदान अनुसुचित जमातींच्या लाभार्थ्यांसाठी वापरण्यात यावे.

३. सदर अनुदानासाठी प्रशासकीय अधिकारी, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. त्यांनी याबाबतचे देयक कोषागारात सादर करुन विहित केलेल्या बाबीवर खर्च करण्यासाठी सदर रक्कम संबंधीत कार्यक्रम अधिका-याकडे सुपूर्द करावी. यासाठी सहसंचालक (अ. व प्र.), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र. २०१३प्र.क्र.८५/२०१३/अर्थसंकल्प-३, दि. २५/४/२०१३ नुसार उपरोक्त निधीचे उपयोगिता प्रमाणपत्र (UC) सादर केल्यानंतरच पुढील अनुदान वितरीत करण्यात येईल.

५. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्रमांक ३५१/आर्थोपाय, दि. ९/२/२०१५ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०३०७१२००४७२२१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Manohar Sadhu Thombare

Digitally signed by Manohar Sadhu Thombare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Under Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Manohar Sadhu Thombare
Date: 2015.03.07 13:59:13 +05'30'

**(मनोहर ठोंबरे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा), महाराष्ट्र -१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर.
३. आयुक्त (कु.क.) तथा संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई.
५. अतिरिक्त संचालक, राज्य कुटुंब कल्याण कार्यालय, पुणे.
६. सहसंचालक (अर्थ व प्रशासन), आरोग्य सेवा, मुंबई.
७. सहायक संचालक, अर्थ व प्रशासन, पुणे.
८. प्रशासकीय अधिकारी (आहरण व संवितरण अधिकारी), आरोग्य सेवा संचालनालय, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
११.वित्त विभाग (अर्थसंकल्प), मंत्रालय, मुंबई.
१२.आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३.सार्वजनिक आरोग्य विभाग (अर्थसंकल्प शाखा) मंत्रालय, मुंबई.
१४.सार्वजनिक आरोग्य विभाग (लेखा शाखा) मंत्रालय, मुंबई.
१५.निवड नस्ती (आरोग्य-७).